**नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील रचना सहायक (स्थापत्य अभियांत्रिकी-पदविकाधारक) संवर्गातील कर्मचाऱ्यांना सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी दोन, गट-ब म्हणून पदनिर्देशित करण्यासाठी शिफारस करण्याकरीता समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- वेतन-१७२०/२८६/प्र.क्र.५८/नवि-२७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
चौथा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २३ नोव्हेंबर, २०२०

**वाचा:-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टीपीव्ही-१९९०/५६/प्र.क्र.१९०/भाग-२/नवि-२७, दि.०७.०७.१९९७.
२) नगर विकास विभाग, अधिसूचना दि.०१.०८.२०११.

**शासन आदेश :-**

संदर्भीय क्र.१ येथील दि.०७.०७.१९९७ रोजीच्या शासन निर्णयातील अ.क्र.३ अन्वये शासनाने अभियांत्रिकी शाखांतर्गत पदविका धारण करणाऱ्या सध्याच्या रचना सहायकांना त्यांच्या सध्याच्या नियुक्तीच्या दिनांकापासून ५ वर्षाच्या सलग सेवेनंतर सहायक नगर रचनाकार (राजपत्रित वर्ग-२ कनिष्ठ स्तर) या संवर्गातून समावून घेऊन त्यांना दि.०१.०४.१९८१ पासून रु.६००-३०-७५०-४०-९५० (असुधारित) आणि दि.०१.०१.१९८६ पासून रु.२०००-६०-२३००-दरो-७५-३२०० अशी सुधारित वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली आहे.

२. तसेच, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील तांत्रिक संवर्गातील संचालक, नगर रचना ते सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-२, (गट-ब / राजपत्रित) पदांचे सेवाप्रवेश नियम दि.०१ ऑगस्ट, २०११ पासून विनियमित करण्यात आले आहेत. सदर सेवाप्रवेश नियमातील परिच्छेद क्र.९ मध्ये पुढीलप्रमाणे नमूद आहे. **"संचालनालयामध्ये रचना सहायक हे पद धारण करणाऱ्या आणि नियमित तत्वावर रचना सहायक या पदावर पाच वर्षे अखंड सेवा झालेल्या व्यक्तीस आयोगाशी विचारविनिमय करून, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-दोन, गट-ब म्हणून पदनिर्देशित करता येईल."**

३. नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील रचना सहायक (स्थापत्य अभियांत्रिकी-पदविकाधारक) संवर्गातील कर्मचाऱ्यांना सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी दोन, गट-ब म्हणून पदनिर्देशित करण्यासाठी शिफारस करण्याकरीता खालील अधिकाऱ्यांची समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | सह / उप सचिव (आस्थापना / नवि-२७) | --- | अध्यक्ष |
| (२) | उपसंचालक, नगर रचना, मुख्य कार्यालय, पुणे | --- | सदस्य |
| (३) | विभागात कार्यरत असलेले मागासवर्गीय संवर्गातील उप सचिव / अवर सचिव* | --- | सदस्य (मागासवर्गीयांचे प्रतिनिधी) |
| (४) | अवर सचिव (नवि-२७) | --- | सदस्य सचिव |

* आवश्यक असेल तेव्हा विभागामध्ये जे मागासवर्गीय अधिकारी कार्यरत असतील त्यांना मागासवर्गीयांचे प्रतिनिधी म्हणून काम करण्यास विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (नवि-१) हे प्राधिकृत करतील.

४. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२०११२३१३०९५६१२२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.11.23 15:31:11 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व सह संचालक, नगर रचना,
३. सर्व उप संचालक, नगर रचना,
४. सर्व सहायक संचालक, नगर रचना,
५. सर्व उप सचिव / अवर सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती / नवि-२७.

***